**शासन सेवेत पुन:स्थापना व पदस्थापना**
**श्री.दत्तू रामभाऊ सोनवणे,**
**उप अधिक्षक भूमि अभिलेख.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्रमांक:- पुन:स्था-०१२५/प्र.क्र.१४/ई-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक : ११ फेब्रुवारी, २०२५

**वाचा:-**

१.जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.राज्य), पुणे यांचे आदेश, क्र.आस्था/एस.आर.६८७०/आ-२/२०२४, दि.१८.०६.२०२४
२.महसूल व वन विभाग, शासन ज्ञापन, क्र.विभाचौ-१२२४/प्र.क्र.४८१/ई-६, दि.२०.०१.२०२५
३.महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र.निप्रआ-२०१५/प्र.क्र.१०५/ई-४,दि.०८.०५.२०१५
४.सामान्य प्रशासन विभाग,शासन परिपत्रक,क्र.निप्रआ-१११२/प्र.क्र.८२/११-अ,दि.२०.०४.२०१३

**शासन आदेश:-**

श्री.दत्तू सोनवणे, तत्का.उप अधिक्षक भूमि अभिलेख, परभणी (निलंबित) यांना लाचेचा सापळा प्रकरणी लाचलुचपत प्रतिबंधक विभागाने दाखल केलेल्या गुन्ह्याच्या अनुषंगाने वाचा क्र.१ येथील आदेशान्वये दि.०४.०६.२०२४ पासून शासन सेवेतून निलंबित केले आहे. तसेच श्री.सोनवणे यांच्याविरुद्ध वाचा क्र.२ येथील ज्ञापनान्वये विभागीय चौकशीची कार्यवाही सुरु करण्यात आली आहे.

२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.३१.०१.२०१५ मधील तरतुदींच्या अनुषंगाने महसूल व वन विभाग, शासन निर्णय, दि.०८.०५.२०१५ (वाचा क्र.३) अन्वये गठीत करण्यात आलेल्या निलंबन आढावा समितीने श्री.सोनवणे यांना शासन सेवेत पुन:स्थापित करण्याची शिफारस केली आहे. त्यानुसार श्री.सोनवणे यांच्याविरुद्धच्या विभागीय चौकशी प्रकरण व लाचलुचपत प्रतिबंधक विभागाद्वारे त्यांच्याविरुद्ध दाखल गुन्ह्याच्या अनुषंगाने न्यायालयीन प्रकरण उद्भवल्यास त्यातील निर्णयांच्या अधीन राहून त्यांना शासन सेवेत पुन:स्थापित करण्यात येत आहे.

३. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक, दि.२०.०४.२०१३ (वाचा क्र.४) मधील तरतुदीन्वये श्री.दत्तू सोनवणे, उप अधिक्षक भूमि अभिलेख यांची पुन:स्थापनेनंतर पुढील तक्त्यातील रकाना क्र.३ येथे नमूद पदावर पदस्थापना करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | पदस्थापनेचे पद/ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.दत्तू रामभाऊ सोनवणे, उप अधिक्षक भूमि अभिलेख. | उप अधीक्षक भूमि अभिलेख, राजुरा, जि. चंद्रपूर | रिक्त पदी |

४. श्री.सोनवणे यांनी पदस्थापनेच्या पदावर तात्काळ रुजू व्हावे तसेच त्यांना रुजू होण्यासाठी जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.रा.), पुणे यांनी आवश्यक ती कार्यवाही त्वरीत करावी व त्यांचा पदस्थापनेच्या पदावरील रुजू अहवाल शासनास सादर करावा.

**५.** सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२५०२१११३०९३९७११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by ASHWINI BHIMRAO YAMGAR
Date: 2025.02.11 13:12:18 +05'30'

**(अश्विनी यमगर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:**

१. जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.रा.), पुणे.
२. श्री.दत्तू रामभाऊ सोनवणे, तत्का.उप अधिक्षक भूमि अभिलेख, परभणी.
(जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.रा.), पुणे यांच्यामार्फत)

**प्रत:-**

१) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२.
२) अप्पर मुख्य सचिव (महसूल), तथा अध्यक्ष, निलंबन आढावा समिती, महसूल व वन विभाग मंत्रालय, मुंबई-३२.
३) अतिरिक्त महासंचालक, लाचलूचपत प्रतिबंधक विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई तथा सदस्य निलंबन आढावा समिती
४) सह/उप सचिव (गृह विभाग) तथा सदस्य, निलंबन आढावा समिती
५) सह/उप सचिव (महसूल विभाग-ई४अ) तथा सदस्य, निलंबन आढावा समिती
६) उप संचालक भूमि अभिलेख, नागपूर प्रदेश, नागपूर.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
८) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
९) कार्यासन ई-६ संग्रहार्थ.